वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-२
वित्तीय अधिकारामध्ये सुधारणा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मावज-२०१८ /प्र.क्र.२३९/३४**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २६ मार्च, २०२०.

**प्रस्तावना :-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या प्रसिद्धी माध्यमांपैकी मुद्रित, इलेक्ट्रॉनिक व इतर माध्यमांवर होणाऱ्या खर्चाचा विचार करता, बाजारमुल्य व वित्तीय अधिकारान्वये प्रदान करण्यात आलेली आर्थिक तरतूद यामध्ये खुपच तफावत दिसून येत आहे. शासनाची विविध धोरणे, मोहिमा, योजना जनतेपर्यंत पोहोचविण्याकरीता विविध वृत्तपत्रे, मासिके घडीपुस्तिका, भित्तीपुस्तके इत्यादिंच्या माध्यमातून प्रसिध्द करण्यात आलेल्या जाहिरातींवर होणाऱ्या खर्चात भरमसाठ वाढ झाली आहे. शासकीय संदेशाचे प्रसारण आणि शासकीय योजनांबाबत जनजागृती अंतर्गत बाबींवर होणारा संभाव्य खर्च दिवसेंदिवस वाढत आहे. जाहिरातींवर होणारा खर्च विहित मर्यादेपेक्षा जास्त होत असल्याने वाढीव खर्चास वेळोवेळी शासन मान्यता घेणे क्रमप्राप्त ठरते. खर्चास मंजुरी प्राप्त होण्यास कालापव्यय होऊन उपक्रम व प्रसंगाचे औचित्य राहत नाही. महासंचालनालयाच्या विविध शाखांमार्फत होणारे कामकाजाचे बदलते स्वरुप उदा. जाहिरातींच्या अपारंपरिक माध्यमे (उदा. लाईव्ह मिडिया, संप्रेषण माध्यमे इत्यादी), आधुनिक तंत्रज्ञानामुळे नव्याने उदयास आलेली माध्यमे (उदा.समाज माध्यमे), जाहिरातीचा प्रभाव आजमाविण्याकरिता सर्वेक्षण करणे इत्यादी बाबींचा समावेश करुन शासनाने वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-एक , उपविभाग दोन मध्ये सामान्य प्रशासन विभाग तसेच विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांना प्रदान करण्यात आलेल्या सध्याच्या वित्तीय अधिकार मर्यादेत वाढ करणे तसेच काही वित्तीय शक्ती नव्याने समाविष्ट करुन, होणारा खर्च व प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारामध्ये कालानुरुप सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, अ.क्र.८, नियम क्र.१७ (जाहिरातींवर होणारा खर्च) मधील अस्तित्वातील दोन बाबी (वृत्तपत्रे अथवा अन्य छापील जाहिरातींसाठी (वितरण) आणि दूरचित्रवाणी/व्हीडीओ फिल्म/इंटरनेट इत्यादींवर जाहिरातीसाठी (वितरण)/ दृकश्राव्य माध्यमांकरीता व्हिडीओ,लघुपट, टिव्हीसी याकरीता सर्जनशील कामे (चित्रीकरण सोबत संपादन, निवेदन आदी, लाईव्ह स्ट्रिमिंग व सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे नवीन वित्तीय शक्तींकरीता सामान्य प्रशासन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांना प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार मर्यादेत सहा वित्तीय शक्ती नव्याने समाविष्ट करुन वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग -दोन मध्ये वाढ करण्यात येत आहे. विभागप्रमुख/कार्यालयप्रमुख यांची यादी सोबतच्या प्रपत्र-ब मध्ये नमुद करण्यात आली आहे.

२. प्रशासनिक विभाग/विभाग प्रमुख/प्रादेशिक कार्यालय प्रमुख व कार्यालय प्रमुख यांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-दुसरा अन्वयें ज्या वित्तीय शक्तींकरिता विशेष अधिकार प्रदान करण्यात आले असतील त्या वित्तीय शक्तींकरिता वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, अनुक्रमांक-८, नियम १७ (जाहिरातीवर होणारा खर्च) मधील वित्तीय अधिकाराचा वापर करता येणार नाही.

३. प्रपत्रामध्ये नमूद केलेल्या बाबींच्या संदर्भात त्यासमोर विहित केलेल्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च अपेक्षित असल्यास अथवा विहित अटी किंवा त्यातील एखादी अट पूर्ण होत नसेल तर अशा प्रस्तावास वित्त विभागाची / प्रशासकीय विभागाची वित्तीय व प्रशासकीय मंजूरी आवश्यक राहील.

४. सदर शासन आदेशान्वयें प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचे पालन करताना शासकीय संदेशाचे प्रसारण व शासकीय योजनांबाबत जनजागृती यासाठी येणाऱ्या सर्व माध्यमांसाठी विविध स्तरावर येणाऱ्या खर्चाच्या बाबींकरीता शासनाकडून वेळोवेळी जारी करण्यात आलेल्या शासनाच्या सर्वसाधारण आदेशांचे काटेकोर पालन करण्यात यावे. तसेच अग्रिमाद्वारे खर्च करण्याऐवजी अधिदान व लेखा कार्यालय/ कोषागार कार्यालयामध्ये तपशिलवार देयके सादर करुन खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

५. प्राधिकाऱ्यांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा वापर करताना, त्यावर नियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीने, संबंधित वित्तीय शक्तींच्या समोर विहित करण्यात आलेल्या वित्तीय मर्यादेचे सक्षम अधिकाऱ्यांकडून उल्लंघन होणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

६. ज्या बाबतीत वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आलेले नाहीत तसेच अधिकार प्रदान काही अटींच्या अधीन केले असतील व त्या अटी किंवा त्यातील एखादी अट पूर्ण होत नसेल तर त्या बाबतीत प्रशासकीय किंवा वित्तीय मंजूरी वित्त विभागाच्या पूर्व संमतीशिवाय देता येणार नाही.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५१४/२०१९/विनियम, दि.२८.११.२०१९ अन्वयें प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२००३२६१७०१२८५९०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ramkisan Narayanrao Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2020.03.26 17:15:00 +05'30'

**( रा. ना. मुसळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (ले. व को.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव तथा महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८. संचालक (माहिती)(प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व विभागीय उपसंचालक/ सर्व जिल्हा माहिती अधिकारी
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
११. महालेखापाल (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१४. उप सचिव, कार्यासन- ३४, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. उप सचिव, कार्यासन- २५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१९ / कार्यासन-२५, मंत्रालय, मुंबई.
१७. वित्त विभाग कार्यासन व्यय-४ / विनियम /अर्थ-१४ ,मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती, कार्यासन-३४.

## प्रपत्र-अ

## सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील माहिती व जनसंपर्क संचालनालयाशी संबंधित खालील बाबींकरिता भाग-२ अन्वये वित्तीय अधिकार प्रदान करण्याबाबत.

| अ.क्र. | प्रचलित शक्ती/नविन शक्तीचे वर्णन, प्रचलित शक्ती असल्यास, आदेश क्रमांक व दिनांक दर्शवून आदेशाची प्रत जोडावी. नवीन शक्ती असल्यास 'नवीन शक्ती' असा उल्लेख करावा | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम अधिकारी | वित्तीय मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १. | **नवीन शक्ती**<br>**अ) वृत्तपत्रे अथवा अन्य छापील जाहिरातींसाठी (वितरण)**<br><br>**ब) दूरचित्रवाणी / व्हीडीओफिल्म / इंटरनेट इत्यादीवरील जाहिरातीसाठी (वितरण)**<br><br>**क) दृकश्राव्य माध्यमांकरीता व्हिडीओ, लघुपट, टिव्हीसी याकरीता सर्जनशील कामे (चित्रीकरण सोबत संपादन, निवेदन आदी)**<br><br>**ड) लाईव्ह स्ट्रिमिंग** | १) प्रशासनिक विभाग<br><br>२) विभागप्रमुख<br><br>३) प्रादेशिक कार्यालय प्रमुख<br><br>४) कार्यालय प्रमुख | **रु.१० कोटी**<br><br>**रु. ५ कोटी**<br><br>**रु.१ कोटी**<br><br>**रु.५० लक्ष** | १) विहित कार्यपदधती, निविदा दर करार पद्धती अवलंबून सर्वसाधारण निर्देशांचे अनुपालन करण्यात यावे.<br>२) अर्थसंकल्पात तरतूद केलेली असली पाहिजे.<br>३) दर्शनी आणि वर्गीकृत जाहिरातीसाठी हे अधिकार लागू राहतील.<br>४) खर्चामध्ये काटकसर करण्यासंबंधीच्या आदेशांचे आणि संबंधित नियमांचे अनुपालन करण्यात यावे.<br>५) वित्त विभागाकडून वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणा / तरतूदींचे पालन करणे आवश्यक राहील.<br>६) शासन मान्य दरानुसार खर्च करण्यात यावा. ज्या माध्यमांसाठी शासनमान्य दर उपलब्ध नाहीत त्या माध्यमांच्या बाबतीत विहित पद्धतीनुसार / अथवा दरपत्रक निविदा मागवून कार्यवाही करण्यात यावी.<br>७) दूरचित्रवाणीच्या चॅनेलवर जाहिरात देण्यास वित्त विभागाची मान्यता घेण्यात यावी. |
| २. | **नवीन शक्ती**<br><br>**अ) रेडिओ/ सार्वजनिक उदघोषणा**<br><br>**ब)समाज माध्यमे (श्राव्य माध्यमाकरीता सर्जनशील कामे सोबत ध्वनिमुद्रण, डबिंग, संपादन आदी)**<br><br>**क)छापील माध्यमांकरिता (क्रियेटिव्ह वर्क,सर्जनशील कामे,डिझाईन)** | १)प्रशासनिक विभाग<br><br>२)विभाग प्रमुख<br><br>३)प्रादेशिक कार्यालय प्रमुख<br><br>४) कार्यालय प्रमुख | **रु.१ कोटी**<br><br>**रु.५० लक्ष**<br><br>**रु.२५ लक्ष**<br><br>**रु.१० लक्ष** | १) विहित कार्यपदधती, निविदा दर करार पद्धती अवलंबून सर्वसाधारण निर्देशांचे अनुपालन करण्यात यावे.<br>२) अर्थसंकल्पात तरतूद केलेली असली पाहिजे.<br>३) दर्शनी आणि वर्गीकृत जाहिरातीसाठी हे अधिकार लागू राहतील.<br>४) खर्चामध्ये काटकसर करण्यासंबंधीच्या आदेशांचे आणि संबंधित नियमांचे अनुपालन करण्यात यावे.<br>५) वित्त विभागाकडून वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणा / तरतूदींचे पालन करणे आवश्यक राहील.<br>६) शासन मान्य दरानुसार खर्च करण्यात यावा. ज्या माध्यमांसाठी शासनमान्य दर उपलब्ध नाहीत त्या माध्यमांच्या बाबतीत विहित पद्धतीनुसार / अथवा दरपत्रक निविदा मागवून कार्यवाही करण्यात यावी. |

| _अ.क्र. | प्रचलित शक्ती/नविन शक्तीचे वर्णन, प्रचलित शक्ती असल्यास, आदेश क्रमांक व दिनांक दर्शवून आदेशाची प्रत जोडावी. नवीन शक्ती असल्यास 'नवीन शक्ती' असा उल्लेख करावा | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम अधिकारी | वित्तीय मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| ३. | <u>**नवीन शक्ती**</u><br>**अ) सार्वजनिक फलक**<br>(होर्डिंग उभारणी तसेच , फ्लेक्स बॅनर लावणे)<br><br>**ब) बाहय माध्यमे** (आऊट डोअर प्रदर्शने, सार्वजनिक दूरचित्रवाणी संच डिस्प्ले बोर्ड,स्क्रोल बोर्ड,सार्वजनिक वाहनांवरील संदेश) | १)प्रशासनिक विभाग<br>२)विभाग प्रमुख<br>३) प्रादेशिक कार्यालय प्रमुख<br>४) कार्यालय प्रमुख | **रु.१ कोटी**<br>**रु.५० लक्ष**<br>**रू.२५ लक्ष**<br>------- | १) विहित कार्यपदधती, निविदा दर करार पद्धती अवलंबून सर्वसाधारण निर्देशांचे अनुपालन करण्यात यावे.<br>२) अर्थसंकल्पात तरतूद केलेली असली पाहिजे.<br>३) दर्शनी आणि वर्गीकृत जाहिरातीसाठी हे अधिकार लागू राहतील.<br>४) खर्चामध्ये काटकसर करण्यासंबंधीच्या आदेशांचे आणि संबंधित नियमांचे अनुपालन करण्यात यावे.<br>५) वित्त विभागाकडून वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणा / तरतूदींचे पालन करणे आवश्यक राहील.<br>६) शासन मान्य दरानुसार खर्च करण्यात यावा. ज्या माध्यमांसाठी शासनमान्य दर उपलब्ध नाहीत त्या माध्यमांच्या बाबतीत विहित पद्धतीनुसार / अथवा दरपत्रक निविदा मागवून कार्यवाही करण्यात यावी. |
| ४. | <u>**नवीन शक्ती**</u><br>**अ)संप्रेषण माध्यमे** (कम्युनिकेशन) मेळावे, परिषदा, गटचर्चा<br>**ब) लाईव्ह मिडीया** (पथनाट्य,लोककला आदी द्वारे शासकीय योजनांबाबत जनजागृती) | १) प्रशासनिक विभाग<br>२)विभाग प्रमुख<br>३)प्रादेशिक कार्यालय प्रमुख<br>४)कार्यालय प्रमुख | **रु. ५० लक्ष**<br>**रु. २५ लक्ष**<br>**रू.५ लक्ष**<br>------- | १) विहित कार्यपदधती, निविदा दर करार पद्धती अवलंबून सर्वसाधारण निर्देशांचे अनुपालन करण्यात यावे.<br>२) अर्थसंकल्पात तरतूद केलेली असली पाहिजे.<br>३) दर्शनी आणि वर्गीकृत जाहिरातीसाठी हे अधिकार लागू राहतील.<br>४) खर्चामध्ये काटकसर करण्यासंबंधीच्या आदेशांचे आणि संबंधित नियमांचे अनुपालन करण्यात यावे.<br>५) वित्त विभागाकडून वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणा / तरतूदींचे पालन करणे आवश्यक राहील.<br>६) शासन मान्य दरानुसार खर्च करण्यात यावा. ज्या माध्यमांसाठी शासनमान्य दर उपलब्ध नाहीत त्या माध्यमांच्या बाबतीत विहित पद्धतीनुसार / अथवा दरपत्रक निविदा मागवून कार्यवाही करण्यात यावी. |

| _अ.क्र. | प्रचलित शक्ती/नविन शक्तीचे वर्णन, प्रचलित शक्ती असल्यास, आदेश क्रमांक व दिनांक दर्शवून आदेशाची प्रत जोडावी. नवीन शक्ती असल्यास 'नवीन शक्ती' असा उल्लेख करावा | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम अधिकारी | वित्तीय मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| ५. | **नवीन शक्ती**<br><br>**अ) अन्य माध्यमे - कुपन्स**<br>(रेल्वे तिकिटे, पोस्ट कार्ड, अन्य कुपन्स अथवा प्रवेश पत्रिका) शासकीय संदेशाचे प्रसारण<br>**ब) अन्य माध्यमे** (वरील संवर्गात न येणारी मात्र प्रभावी ठरणारी परंपरागत व आधुनिक माध्यमे)<br>माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजावणी समिती यांनी तयार केलेल्या आराखडयानुसार. | १)प्रशासनिक विभाग<br><br>२)विभाग प्रमुख<br><br>३)प्रादेशिक कार्यालय प्रमुख<br><br>४)कार्यालय प्रमुख | **रु. ५० लक्ष**<br><br>**रु. २५ लक्ष**<br><br>**रू.५ लक्ष**<br><br>------- | १) विहित कार्यपदधती, निविदा दर करार पद्धती अवलंबून सर्वसाधारण निर्देशांचे अनुपालन करण्यात यावे.<br>२) अर्थसंकल्पात तरतूद केलेली असली पाहिजे.<br>३) दर्शनी आणि वर्गीकृत जाहिरातीसाठी हे अधिकार लागू राहतील.<br>४) खर्चामध्ये काटकसर करण्यासंबंधीच्या आदेशांचे आणि संबंधित नियमांचे अनुपालन करण्यात यावे.<br>५) वित्त विभागाकडून वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणा / तरतूदींचे पालन करणे आवश्यक राहील.<br>६) शासन मान्य दरानुसार खर्च करण्यात यावा. ज्या माध्यमांसाठी शासनमान्य दर उपलब्ध नाहीत त्या माध्यमांच्या बाबतीत विहित पद्धतीनुसार / अथवा दरपत्रक निविदा मागवून कार्यवाही करण्यात यावी. |
| ६. | **नवीन शक्ती**<br>**प्रभाव अजमावणी (इम्पॅक्ट असेंसमेंट /प्रतिसाद अहवाल/फिडबॅक रिपोर्ट)** | १) प्रशासनिक विभाग<br><br>२) विभाग प्रमुख<br><br>३) प्रादेशिक कार्यालय प्रमुख<br><br>४) कार्यालय प्रमुख | **रु. ५० लक्ष**<br><br>**रु. २५ लक्ष**<br><br>**रू.५ लक्ष**<br><br>------- | १) विहित कार्यपदधती, निविदा दर करार पद्धती अवलंबून सर्वसाधारण निर्देशांचे अनुपालन करण्यात यावे.<br>२) अर्थसंकल्पात तरतूद केलेली असली पाहिजे.<br>३) दर्शनी आणि वर्गीकृत जाहिरातीसाठी हे अधिकार लागू राहतील.<br>४) खर्चामध्ये काटकसर करण्यासंबंधीच्या आदेशांचे आणि संबंधित नियमांचे अनुपालन करण्यात यावे.<br>५) वित्त विभागाकडून वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणा / तरतूदींचे पालन करणे आवश्यक राहील.<br>६) शासन मान्य दरानुसार खर्च करण्यात यावा. ज्या माध्यमांसाठी शासनमान्य दर उपलब्ध नाहीत त्या माध्यमांच्या बाबतीत विहित पद्धतीनुसार / अथवा दरपत्रक निविदा मागवून कार्यवाही करण्यात यावी. |

**प्रपत्र-ब**

**सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील माहिती व जनसंपर्क संचालनालयाशी संबंधित खालील बाबींकरिता भाग-२ अन्वये वित्तीय अधिकार प्रदान करण्याबाबत.**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | विभाग प्रमुख | कार्यालय प्रमुख |
|---|---|---|---|
| | (१) | (२) | (३) |
| १. | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. |
| २. | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, नागपूर-अमरावती विभाग, नागपूर. | संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, नागपूर-अमरावती विभाग, नागपूर. | संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, नागपूर-अमरावती विभाग, नागपूर. |
| ३. | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, मराठवाडा विभाग, औरंगाबाद. | संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मराठवाडा विभाग, औरंगाबाद. | संचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मराठवाडा विभाग, औरंगाबाद. |
| ४. | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, कोंकण विभाग, नवी मुंबई. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | उपसंचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, कोंकण विभाग, नवी मुंबई. |

| | | | |
|---|---|---|---|
| ५. | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, पुणे विभाग, पुणे. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | उपसंचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, पुणे विभाग, पुणे. |
| ६. | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, नाशिक विभाग, नाशिक. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | उपसंचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, नाशिक विभाग, नाशिक. |
| ७. | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, अमरावती. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | उपसंचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, अमरावती. |
| ८. | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | उपसंचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर. |
| ९. | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, लातूर. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | उपसंचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, लातूर. |
| १०. | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली. | उपसंचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली. | उपसंचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली. |

| | | | |
|---|---|---|---|
| ११. | माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र परिचय केंद्र, पणजी-गोवा. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | उपसंचालक (माहिती), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर विभाग, कोल्हापूर. |
| १२. | अधिपरिक्षक पुस्तके व प्रकाशने, मुंबई. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | अधिपरिक्षक पुस्तके व प्रकाशने, मुंबई. |
| १३. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, ठाणे. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, ठाणे. |
| १४. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, नाशिक. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, नाशिक. |
| १५. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, पालघर. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, पालघर. |
| १६. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, नंदुरबार. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, नंदुरबार. |
| १७. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, धुळे. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, धुळे. |
| १८. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, जळगाव. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, जळगाव. |
| १९. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, अहमदनगर. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, अहमदनगर. |

| | | | |
|---|---|---|---|
| २०. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, बुलढाणा. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, बुलढाणा. |
| २१. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, अकोला. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, अकोला. |
| २२. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, वाशिम. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, वाशिम. |
| २३. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, यवतमाळ. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, यवतमाळ. |
| २४. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, अमरावती. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, अमरावती. |
| २५. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, नागपूर. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, नागपूर. |
| २६. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, वर्धा. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, वर्धा. |
| २७. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, भंडारा. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, भंडारा. |
| २८. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, चंद्रपूर. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, चंद्रपूर. |

| | | | |
|---|---|---|---|
| २९. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, गडचिरोली. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, गडचिरोली. |
| ३०. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, गोंदिया. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, गोंदिया. |
| ३१. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, औरंगाबाद. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, औरंगाबाद. |
| ३२. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, जालना. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, जालना. |
| ३३. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, परभणी. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, परभणी. |
| ३४. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, नादेड. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, नांदेड. |
| ३५. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, लातूर. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, लातूर. |
| ३६. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, उस्मानाबाद. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, उस्मानाबाद. |
| ३७. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, बीड. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, बीड. |

| | | | |
|---|---|---|---|
| ३८. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, हिंगोली. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, हिंगोली. |
| ३९. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, पुणे. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, पुणे. |
| ४०. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, सांगली. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, सागली. |
| ४१. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, सातारा. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, सातारा. |
| ४२. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, कोल्हापूर. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, कोल्हापूर. |
| ४३. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, सिंधुदुर्ग. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, सिंधुदुर्ग. |
| ४४. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, रत्नागिरी. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, रत्नागिरी. |
| ४५. | जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, रायगड. | महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. | जिल्हा माहिती अधिकारी, रायगड. |